राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम
केंद्र हिस्सा अंतर्गत अनुसुचित जाती उपयोजना या घटकासाठी ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने (लेखाशिर्ष २२१५ ९८४४)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेजेएम २०२०/ प्र.क्र.२८ /पापु-१०**

७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ३१ जानेवारी, २०२०

वाचा -

१) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. डब्लू-११०२०/१९७/२०१५- वॉटर-३२, दि.२५.११.२०१९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४ (अ) पापु-७, दि.१७.०३.२०१०

प्रस्तावना -

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी रु.४२.०३९५ कोटी (अनुसुचित जाती घटक) एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीत सुपुर्द केला आहे. त्यापैकी शिल्लक असलेला रु.३८.०३९५ कोटी निधी अंमलबजावणी यंत्रणांना ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

आर्थिक वर्ष २०१९-२० मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरीता अनुसुचित जाती उपयोजना या घटकांसाठी सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे रु.३८,०३,९५,०००/- (रुपये अडतीस कोटी तीन लक्ष पंचाण्णव हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालय यांना पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) सदर निधी अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत लोकसंख्येच्या प्रमाणात खर्च करण्यात यावा.
२) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केवळ अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत केंद्र शासनाने दिलेल्या सुचनेनुसार ग्रामीण भागातील अनुसूचित जातींचे प्राबल्य असलेल्या भागांमधील नळ पाणी पुरवठा योजनासंदर्भात

अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी केंद्रशासनाने व राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावयाचे आहे.

३) संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

४) या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अमंलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करून घेता यावी यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अमंलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्य रितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

५) ग्राम विकास विभागाच्या शासन परिपत्रक क्र. आरसीएन-१०८९/ सीआर-३०२७/२८, दि.०५.०९.१९९० मधील सुचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु-२० ला सादर करावे.

६) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अनुसूचित जाती उपयोजना या घटकाखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५० टक्के केंद्र निधीतून व ५० टक्के राज्य निधीतून करणे आवश्यक आहे. या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत

७) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या योजना प्रणालीवर पुढीलप्रमाणे नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्यावत करण्यात याव्यात.

क. भौतिकदृष्टया १०० पुर्ण परंतु आार्थिकदृष्टया अपूर्ण योजना

ख. >७५ ते >१०० भौतिकदृष्टया पुर्ण

ग. > ५० ते >७५ भौतिकदृष्टया पूर्ण

घ. > २५ ते >५० भौतिकदृष्टया पूर्ण

८) अनुसुचित जाती उपयोजना अंतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी कृती आराखडयात असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा.

९) सदर रक्कम कोषागारातून त्वरीत आहरीत करण्यात यावी व त्यानंतर जल जीवन मिशन अंतर्गत उघडण्यात आलेल्या सार्वजनिक वित्तीय व्यवस्थपन प्रणालीमध्ये (PFMS) जमा करण्यात यावी.

२. सदर निधीतून करण्यात आलेल्या खर्चाची नोंद केंद्र शासनाच्या IMIS प्रणालीवर घेऊन ती वेळोवेळी अद्यावत करण्यात यावी. कोषागारातून रक्कम वेळीच न काढली गेल्यास तसेच सदर रक्कम

या शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनांसाठी न वापरण्यात आल्यास त्याबाबतची संपुर्ण जबाबदारी संबंधितांची राहील.

३. यावर होणारा खर्च क्र वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९८४४) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.०८.०७.२०१९ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ९ व क्र. ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच केंद्र शासनाच्या आदेशान्वये मंजूर व मुक्त केलेली रु.४२.०३९५ कोटी एवढी केंद्र हिश्श्याची रक्कम महाराष्ट्र राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याची खात्री वित्त विभाग- अर्थोपाय शाखा यांच्याकडून करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०११५३२३११४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.02.05 13:21:10 +05'30'

**( वसंत माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
३. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महारष्ट्र-१-मुंबई/२- नागपुर,
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. नियोजन विभाग(कार्यासन १४४३)/ वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई,
६. विभागीय आयुक्त, पुणे
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई

८. संचालक (वित्त) ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा
१०.उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा
११.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, भंडारा
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, भंडारा
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा
१४.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
१५.पापु-०४/२०/२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.निवडनस्ती पापु-१०.

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षासाठी अनुसूचित जाती उपयोजना या घटकासाठी केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरित करण्याबाबत (लेखाशीर्ष २२१५ ९८४४) या विषयावरील शासन निर्णय क्र. जेजेएम २०२०/ प्र.क्र.२८/पापु १०, दि.३१ जानेवारी,२०२० सोबतचे विवरणपत्र

(रु. - कोटीमध्ये)

| अ.क्र. | कार्यालय | वितरित करावयाचा केंद्र हिश्श्याचा निधी |
|---|---|---|
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | रु.३८.०३९५ |
| | एकुण | रु.३८.०३९५ |

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.02.05 13:21:48 +05'30'

( वसंत माने )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन